नियमित निवडसूची, २०२१-२२ (भाग-२):

*"पोलीस उप अधीक्षक/ सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील पदावर पदोन्नतीने पदस्थापना करणेबाबत.*

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन आदेश क्र. रापोसे-०१२२/प्र.क्र.३३/भाग-५/पोल-१अ.**

२ रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०००३२.

दिनांक : २७ एप्रिल २०२३.

**संदर्भ** :-

१) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.एसआरव्ही-२०१८/ प्र.क्र.१५९/ कार्या.-१२, दिनांक ०१.०८.२०१९.

२) शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/ प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१.

३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाची पत्रे क्र.पोमसं/ २/ १०२०/ निनिसु-२०२१-२२/भाग-२/ २०/ २०२२, दिनांक ०४.०७.२०२२, १७.०८.२०२२, १४.११.२०२२, १२.०४.२०२३ व २५.०४.२०२३

४) शासन पत्र, गृह विभाग, क्र. रापोसे-०१२२/प्र.क्र.३३/भाग-२/पोल-१अ, दिनांक ०२.११.२०२२ व २२.११.२०२२.

**शासन आदेश.**

"पोलीस उप अधीक्षक/सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील पदावर पदोन्नती देण्याकरिता तयार करण्यात आलेल्या "पोलीस निरीक्षक (नि:शस्त्र)" या संवर्गातील अधिकाऱ्यांच्या "नियमित निवडसूची २०२१-२२ (भाग-२)" यामध्ये समाविष्ट असलेल्या, पुढील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये नमूद पोलीस अधिकाऱ्यांना, "पोलीस उप अधीक्षक/ सहा. पोलीस आयुक्त (नि:शस्त्र)" या संवर्गातील पदावर सेवाज्येष्ठतेनुसार तात्पुरत्या स्वरुपात, पुढील अटींवर, पदोन्नती देण्यात येत असून, त्यांची स्तंभ (३) मध्ये निर्दिष्ट पदांवर, याद्वारे, पदोन्नतीने पदस्थापना करण्यात येत आहे-

| अ.क्र. (१) | पोलीस अधिकाऱ्याचे नाव (२) | पदोन्नतीने पदस्थापना (३) |
|---|---|---|
| १. | श्री. सुनिल रामचंद्र तेलुरे | पोलीस उप अधीक्षक, आर्थिक गुन्हे शाखा, नाशिक (ग्रामीण). |
| २. | श्री. आनंदा दगडु मुळे | सहायक पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई. |
| ३. | श्री. चंद्रकांत मधुकर निंबाळकर | सहायक पोलीस आयुक्त, पुणे शहर. |
| ४. | श्री. मनजीतसिंह जगदीशसिंह बग्गा | सहायक पोलीस आयुक्त, नाशिक शहर. |

<u>अटी</u>:-

१) उक्त पदोन्नती ही विशेष अनुमती याचिका क्र.२८३०६/२०१७ या प्रकरणात मा.सर्वोच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णय व आदेश यांच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

२) उक्त पदोन्नती ही शा.नि., सा.प्र. विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३६६/१६-ब, दिनांक ०७.०५.२०२१, यास आव्हान देण्यात आलेल्या प्रकरणात मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या न्यायनिर्णयाच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

३) उक्त पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने या तात्पुरत्या पदोन्नतीमुळे संबंधित अधिकारी यांना नियमाधीनतेचा *(regularization)* व सेवाज्येष्ठतेचा *(seniority)* कोणताही हक्क असणार नाही.

२. त्या अनुसार, पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांनी मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण/न्यायालय यांचे आदेश, निवडणुकीची आदर्श आचारसंहिता, कायदा व सुव्यवस्था, इत्यादी लक्षात घेऊन पुढील उचित कार्यवाही करावी.

३. हा शासन आदेश, सामान्य प्रशासन विभागाच्या मान्यतेने *[अनौपचारिक संदर्भ क्र.११३०/२०२२/का.-१२, दिनांक १९.१०.२०२२]* आणि पोलीस आस्थापना मंडळ क्र.१ यांच्या शिफारशीचा यथायोग्य विचार करुन, महाराष्ट्र पोलीस अधिनियम (१९५१ चा २२) याच्या कलम २२न यामध्ये निर्दिष्ट सक्षम प्राधिकारी यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. हा शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०४२७१९३२५३१९२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, pseudonym=E15DEDF011CBE07295FC54DEC7494CDD2EBE3FA9, serialNumber=8538CD1E408948F7D025537D5F6589BD8958D1B95322E66D2CC5EDF89AD0D79E, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2023.04.27 19:39:13 +05'30'

**( स्वप्निल गोपाल बोरसे )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा. उप मुख्यमंत्री, गृह, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

**प्रत-**

१) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
२) पोलीस आयुक्त, पुणे शहर/ नाशिक शहर.
३) विशेष पोलीस महानिरीक्षक, नाशिक परिक्षेत्र, नाशिक.
४) पोलीस अधीक्षक, नाशिक (ग्रामीण).
५) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/ लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.

६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

७) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

८) जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/पुणे.

९) संबंधित पोलीस अधिकारी *(पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, यांच्यामार्फत).*

१०) निवड फाईल, पोल-१अ.